पक्षांच्या पुढाऱ्यांनीं हमी घेतल्यावर म. गांधींनी उपवासाची समाप्ति केली. म. गांधींनीं मुसलमानांच्या अनुकूलतेनें घातलेल्या अटी अगदीं साध्या व किरकोळ स्वरूपाच्या असताहि त्यांवर जिकडे तिकडे जीं भाष्यें होऊं लागलीं तीं निर्भेळ अविचारी, गांधींद्वेषाचीं दर्शक होतीं. या भाष्यांत पाकिस्तानला ५५ कोट रुपये दिले, या घटनेचाहि समावेश करून हिंदूंकडून जिझियासारखी पट्टी लादून ती रक्कम सक्तीनें उभारल्याप्रमाणें हिंदूंमध्यें तावातावानें चर्चा होत असे. म. गांधींनीं राजकारणांतून निवृत्त व्हावें, असें कोणी बोलला कीं त्याचा अनुवाद परोपरीनें सर्व प्रांतांमधून होऊं लागे! म. गांधींनीं 'प्राण असे-तोंवर आपण आपलें कर्तव्यक्षेत्र सोडणार नाहीं' असें जाहीर करताच गांधींविषयीं दारुण वैरबुद्धि बाळगणारांना मोठा पेंच पडला! उपवासांतून गांधी उठले, नव्हे, अशा तरतरीनें उठले कीं यापुढें आपण सव्वाशें वर्षांहून जास्त जगणार अशी उमेद त्यांना वाटूं लागली! राजकारणांतून बाहेर पडत नाहींत, व लवकर मरण्याच्या गोष्टी बोलत नाहींत, तेव्हां त्यांच्या जीविताचा नाश करणें हा उपाय महाराष्ट्रांत कित्येकांना सुचला. वस्तुतः महाराष्ट्राचा व पंजाब-दिल्लीच्या कत्तलीचा बादरायणसंबंध लागणेंहि कठिण. महाराष्ट्रांतील टिळकांच्या तालमींतला वर्ग गांधींच्या चळवळीशीं बहुधा असहकारानें 'सुखं च मे शयनं च मे' अशी वृत्ति धरून वागला. पण यावेळीं त्याच वर्गातल्या कांहीं जणांना 'गांधींचा नाश' या कल्पनेचा हृद्रोग जडला. ता. २० जानेवारीला प्रार्थनेच्या सभेंत बॉंबगोळ्याचा प्रयोग झाला. परंतु गांधी डगमगले नाहींत व सभेंतहि गडबड वाढली नाहीं. बॉंबफेक करणारा पंजाबी तरुण होता. त्यानंतर १० दिवसांनीं एका महाराष्ट्रीय ब्राह्मणानें, म. गांधी प्रार्थनेस निघाले असतां त्यांच्यावर चाल करून पिस्तुलाच्या गोळ्या झाडल्या व आपलें दुष्ट इच्छित शेवटास नेलें! गोळीबार सायंकाळीं ५ वाजून ५ मिनिटांनीं झाला व ५ वाजून ४० मिनिटांनीं महात्माजींचें प्राणोत्क्रमण घडलें. गोळी लागतांच 'हे राम! हे राम!' असे शब्द त्यांच्या मुखांतून बाहेर पडले. मुखांत रामनाम, चेहऱ्यावर हास्य आणि अंगावर गोळ्यांची वृष्टि, अशा स्थितींत मरण यावें ही महात्माजींची मृत्युविषयक इच्छा खरी झाल्याचें प्रत्ययास आलें. त्यांच्या देहान्तानें एका युगप्रवर्तकाचा देहान्त झाला, असें साऱ्या जगानें सिद्ध केलें.

# आमच्याकडे सोल-एजन्सीनें असलेलीं पुस्तकें

| | | |
|---|---|---|
| १ | राजनीतिशास्त्र-परिचय : आचार्य जावडेकर | ३ |
| २ | महायुद्ध आणि राष्ट्रसभा : ,, ,, | ।: |
| ३ | आधुनिक राज्यमीमांसा (भाग १ व २) : ,, ,, | २ |
| ४ | पुरोगामी साहित्य : ,, ,, | २ |
| ५ | महाराष्ट्र व हिंदी राजकारण : ,, ,, | १ |
| ६ | समाईक सहकारी स्वराज्य : ,, ,, | । |
| ७ | लो. टिळक व म. गांधी : ,, ,, | २ |
| ८ | विनोबाजी भावे : साने गुरुजी | १ |
| ९ | स्वराज्यसंस्थापक श्रीशिवराय : साने गुरुजी | । |
| १० | रामाचा शेला : साने गुरुजी | ३ |
| ११ | पत्री : साने गुरुजी | ३॥ |
| १२ | दरबार गोपाळदास : ह. मो. जोशी | ८= |
| १३ | जीवनयोग : ना. ग. जोशी | ।।। |
| १४ | पाकिस्तान : ॲड्. ग. वा. जोशी | १ |
| १५ | कारागृहाच्या भिंती : ना. ग. गोरे | ३ |
| १६ | त्रिमंत्रि-योजना (भाग १ व २) | २॥ |
| १७ | हिंदी रेल्वे-कामगार : वि. न. साने | ।।। |
| १८ | डॉ. सन्यतसेन : वि. म. भुस्कुटे | ३ |
| १९ | साजबा साळी : सुशील परभृत | ३ |
| २० | भ्रान्त जीवन : प्रेमा कंटक | २। |
| २१ | कविता : ना. ग. जोशी | १ |
| २२ | स्वेदगंगा : विंदा करंदीकर | ३ |

सर्व प्रकारच्या पुस्तकांकरितां प्रथम आमच्याकडे चौकशी करा.

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : : टिळक रोड, पुणें २**

